अनुकंपा तत्वावर गट-ड मधील पदावरुन
गट-क मधील पदावर फेरनियुक्ती देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक क्रमांकः अकंपा-२००९/प्र.क्र.४२१/आस्था-९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांकः ३० जानेवारी,२०१०

पहाः १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- अकंपा-१०९२/२३३५/प्र.क्र.९०/ ९३/आठ, दिनांक २६ ऑक्टोबर,१९९४
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- अकंपा-१०९५/प्र.क्र.३४-अ/आठ, दिनांक २३ ऑगष्ट,१९९६.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- अकंपा-१००४/प्र.क्र.५१/२००४/ आठ, दिनांक २२ ऑगष्ट,२००५
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक-२००९/विशा/अस्था २/प्र.क्र.१७/ कावि, दिनांक १५ ऑक्टोंबर,२००९

शासन परिपत्रकः गट-क पदावर नेमणूकीसाठी पात्र असलेल्या अनेक उमेदवारांना गट-"ड" मध्ये नेमणूका देण्यात आलेल्या असून त्यापैकी काही उमेदवारांच्या नेमणूक आदेशामध्ये उपरोक्त संदर्भ क्रमांक-२ येथील शासन निर्णयातील परिच्छेद-४ येथील तरतूदीनुसार नियुक्ती आदेशात "भविष्यात गट-क चे पद उपलब्ध होताच शैक्षणिक पात्रतेनुसार गट-क श्रेणीत नियुक्ती देण्यात येईल." या अटीचा उल्लेख करण्यात आलेला आहे, तर काही उमेदवारांच्या नियुक्ती आदेशामध्ये असा उल्लेख करण्यात आलेला नाही. त्यामुळे ज्या उमेदवारांच्या नेमणूक आदेशामध्ये सदर अटीचा समावेश केलेला नाही असे उमेदवार सेवेमध्ये ज्येष्ठ असूनही त्यांच्यानंतर नेमणूक देण्यात आलेल्या उमेदवारांच्या नेमणूक आदेशामध्ये उक्त अटीचा समावेश केल्यामुळे अशा कनिष्ठत्तम उमेदवारांना गट-क श्रेणीत सामावून घेण्यात येते व अनेक ज्येष्ठ उमेदवार गट-क श्रेणीत समावेशनापासून वंचित राहिलेले आहेत. तेंव्हा ज्या उमेदवारांच्या नियुक्ती आदेशात उपरोक्त अट नमूद करण्यात आलेली नाही अशा गट-ड श्रेणीतील कर्मचा-यांना गट-क श्रेणीत सामावून घेण्यात येईल किंवा कसें अशी विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांनी उपरोक्त संदर्भ क्रमांक-४ येथील पत्रान्वये विचारणा केली आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याबाबतची सुधारित योजना आंमलात आली आहे. सदर शासन निर्णयानुसार शासन सेवेतील मयत किंवा वैद्यकीय अधिका-याने पुढील सेवेसाठी अक्षम ठरविल्याने अकाली निवृत्त करण्यात आलेले किंवा या कारणास्तव सेवेतून काढून टाकण्यात आलेल्या कर्मचा-यांच्या संबंधित पात्र नातेवाईकांना गट-क व गट-ड श्रेणीच्या सरळ सेवाप्रवेशाने भरल्या जाणा-या पदावर नियुक्ती देण्याची तरतूद करण्यात आली. तसेच गट-क मधील पदावर अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी पात्र असलेल्या कर्मचा-याला पदाच्या उपलब्धते अभावि गट-ड मधील पदावर नियुक्ती दिल्यास पद उपलब्ध होताच गट-क मधील पदावर त्याला प्राधान्याने नियुक्ती देण्यात यावी, अशी नियुक्ती सरळसेवा नियुक्तीने भरण्यात येणा-या पदावरील समजण्यात यावी. मात्र, गट-"ड" मधील पदावर अनुकंपा योजने अन्वये नियुक्ती देण्याच्या आदेशात तसा स्पष्ट उल्लेख

करण्यात यावा, तसे करण्यात आले असेल तरच गट "ड" मधील पदावर नियुक्ती देण्यात येईल, अशी तरतूद उपरोक्त संदर्भ क्रमांक-२ येथील शासन निर्णयातील परिच्छेद-४ मध्ये करण्यात आली. तद्नंतर अनुकंपा नियुक्ती संबंधीच्या प्रचलित कार्यपध्दती व योजनेच्या तरतूदीत सुधारणा करुन उपरोक्त संदर्भ क्रमांक-३ येथील सुधारीत शासन आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

३. वर नमूद केल्यानुसार शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतूदी स्वयंस्पष्ट आहेत व हेच शासनाचे धोरण आहे. अशा परिस्थितीत याव्दारे अशा सूचना देण्यात येत आहेत की, अनुकंपा नियुक्ती संदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय हे धोरणात्मक निर्णय असून त्यामधील अटी स्वयंस्पष्ट असून त्या शिथिलक्षम नाहीत. त्यामुळे सदर तरतूदीनुसार कार्यवाही करुन शासन आदेशांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी नियुक्ती प्राधिका-यांची आहे. परंतु सदर तरतूदींनुसार नियुक्ती आदेशांमध्ये अटी व शर्तीचा उल्लेख न केल्यामुळे जर उमेदवार गट-क च्या पदावरील नियुक्तीपासून वंचित रहात असतील तर संबंधित नियुक्ती प्राधिका-यांवर नियमानुसार योग्य ती जबाबदारी निश्चित करावी. तसेच भविष्यात अशी परिस्थिती उद्भवू नये यासाठी सर्व नियुक्ती प्राधिका-यांनी नियुक्ती आदेशामध्ये आवश्यकतेनुसार उक्त अट नमूद करण्याची दक्षता घ्यावी.

४. मात्र, ज्या उमेदवारांना गट-ड श्रेणीत अनुकंपा तत्वावर नियुक्ती दिली आहे असे कर्मचारी गट-क श्रेणीतील पदाकरिता सेवाप्रवेश नियमात विहित केलेल्या अर्हता पूर्ण करीत असल्यास ३ वर्षे सेवा पूर्ण केल्यानंतर पदोन्नतीच्या कोटयात उपलब्ध असलेल्या रिक्त पदावर विहित कार्यपध्दती अवलंबून पदोन्नतीकरिता पात्र ठरल्यास पदोन्नती देता येईल.

५. वर नमूद केल्यानुसार शासन सुचनांचे पालन करण्याबाबतची दक्षता घ्यावी. तसेच उपरोक्त परिच्छेद-३ मध्ये नमूद केल्यानुसार विभागीय आयुक्तांनी संबंधित जिल्हा परिषदांमधील नियुक्ती प्राधिकारी यांची जबाबदारी निश्चित करुन नियमानुसार कारवाई करावी व केलेल्या कार्यवाहीबाबतचा एकत्रित पूर्तता अहवाल विभागीय आयुक्तांनी शासनाकडे ३ महीन्याच्या आत सादर करावा.

६. हे परिपत्रक सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-६९/आठ, दिनांक ७.१.२०१० अन्वये दिलेल्या अभिप्रायानुसार निर्गमित करण्यात येत असुन त्याचा संगणक संकेतांक क्रमांक -२०१००१३०१९२१४८००१ अन्वये महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

( प्रकाश हिर्लेकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,
उप सचिव, (कार्या.-आठ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
विभागीय आयुक्त (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
निवड नस्ती, (आस्था-९)